**पशुपालक उत्पादक कंपन्यांच्या माध्यमातून पशुसंवर्धनातून ग्रामविकास या संकल्पनेच्या अंमलबजावणीसाठी समिती गठीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/ प्र.क्र. ४४ / पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : १२ मे, २०१७**

वाचा - आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-१६ (१७)/ सीआर-१७६/२०१६/पसं ६, पुणे, दिनांक ०६.०२. २०१७.

**प्रस्तावना :**

दूध अंडी व मांस उत्पादन ही पशुसंवर्धन विभागाची प्रमुख उद्दीष्टे आहेत. राज्याच्या तसेच देशाच्या वाढत्या लोकसंख्येस या पशुजन्य पदार्थांचा पुरेशा प्रमाणात पुरवठा करण्याकरीता पशुधनापासून मिळणाऱ्या उत्पादनांमध्ये सतत वाढ करणे आवश्यक आहे. विविध कारणांमुळे कृषि क्षेत्राचा अपेक्षित वृध्दी दर राखण्यात यश येत नसल्यामुळे अडीअडचणीच्या काळात शेतकऱ्यास तारुन नेण्यास पशुसंवर्धन विषयक व्यवसायच हातभार लावीत आहेत, ही वस्तुस्थिती आहे. किंबहुना, पशुसंवर्धनामुळेच कृषि व संलग्न क्षेत्राचा एकत्रित वृध्दी दर समाधानकारक रहात आहे.

केंद्र व राज्य शासनामार्फत पशुसंवर्धन विषयक जिल्हास्तरीय, राज्यस्तरीय व केंद्र पुरस्कृत विविध योजना राज्यात राबविण्यात येत आहेत. तथापि, या योजनांची अंमलबजावणी काही ठिकाणी परिणामकारकरित्या न होणे, वैयक्तिक लाभ, येणाऱ्या योजनांचा लाभ त्या व्यक्तीपुरताच सीमित राहणे इ. अनेक कारणांमुळे दूध, अंडी, मांस या उत्पादनांमध्ये आणखी वाढ होण्याची क्षमता असूनही ती सीमित रहात आहे. कोणाही इच्छूक पशुपालकास त्यामध्ये सहभागी होण्याची संधी वाढविण्याकरीता आणि त्याचवेळी प्रकल्पामध्ये कायम सक्रीय राहण्याची व त्यामध्ये आर्थिक घडामोडींना देखील तो जबाबदार राहील याची खात्री करण्यासाठी शासनाच्या विविध योजना पशुपालकांपर्यंत पोहोचविण्याच्या पध्दतीमध्ये काहीसा बदल करणे आवश्यक आहे. या अंतर्गत ग्राम, जिल्हा आणि राज्य स्तरावर पशुपालक उत्पादक कंपन्यांच्या माध्यमातून भविष्यात पशुसंवर्धन विषयक विविध प्रकल्प राबविण्याचे प्रस्तावित असून याबाबाबतचे कार्य करण्यासाठी समितीचे गठण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

पशुपालक कंपन्यांच्या माध्यमातून पशुसंवर्धनातून ग्रामविकास या संकल्पनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | श्री. प्रकाश पागे, सनदी लेखापाल व सल्लागार, द्वारा मे. पी.व्ही.पागे आणि कंपनी पुणे, २०१, सरदारगृह, १९८ लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ०२ | अशासकीय सदस्य |
| ३ | उपसचिव (पशुसंवर्धन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४ | श्री. मंदार साठे, कंपनी सेक्रेटरी, ४५ fA ५ वा माळा, इमारत क्र. १३५८, गद्रे चेंबर्स, सदाशिव पेठ पुणे- ३० | अशासकीय सदस्य |
| ५ | श्री सुनिल पोटे, युवा मित्र, अशासकीय संघटना, सिन्नर, जि. नाशिक. | अशासकीय सदस्य |
| ६ | श्री.किरण पटवर्धन, व्यावसायिक सल्लागार, प्रसाद अपार्टमेंट लेन क्र. ९, प्रभात रोड, डेक्कन जिमखाना, पुणे-०४ | अशासकीय सदस्य |
| ७ | श्री. माणिकराव दांगडे पाटील,बारामती, जि. पुणे | अशासकीय सदस्य |
| ८ | ॲड श्री. अनिरुध्द येचाळे, लातूर | अशासकीय सदस्य |
| ९ | श्री. राजाभाऊ फड, परळी, जि. बीड | अशासकीय सदस्य |
| १० | श्री. भास्कर राजाराम अंबेकर, सिंगल जीन, गांधी चमन, जुना जालना. | अशासकीय सदस्य |
| ११ | श्री. धनंजय परकाळे, प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नाशिक विभाग,नाशिक. | सदस्य सचिव. |

सदर समितीने सुरुवातीच्या कालावधीत राज्यातील चंदपूर, रत्नागिरी, जालना, सातारा, अहमदनगर व अमरावती या सहा जिल्हयांमध्ये प्रायोगिक तत्वावर कार्य करावे. तसेच या समितीचे कार्य त्वरीत सुरु करण्याच्या दृष्टीने समितीच्या कामासाठी आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयास उपलब्ध असलेल्या कार्यालयीन खर्च या बाबी अंतर्गत खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०५१५१०२८४३०५०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shashank M. Sathe

Digitally signed by Shashank M. Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6b4e6443f4621997398029547f71977c2d89e32e391d622c519f39893078c30b, cn=Shashank M. Sathe
Date: 2017.05.15 10:33:29 +05'30'

**(श. मा. साठे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :-

मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ३२

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे- ६७
२. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, (सर्व विभाग)
३. डॉ. धनंजय परकाळे, प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नाशिक विभाग,नाशिक
४. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, चंदपूर, रत्नागिरी, जालना, सातारा, अहमदनगर व अमरावती.
५. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, चंदपूर, रत्नागिरी, जालना, सातारा, अहमदनगर व अमरावती
६. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
७. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
८. श्री. प्रकाश पागे, सनदी लेखापाल व सल्लागार, द्वारा मे. पी.व्ही.पागे आणि कंपनी पुणे, २०१, सरदारगृह, १९८ लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ०२
९. श्री. मंदार साठे, कंपनी सेक्रेटरी, ४५ fA ५ वा माळा, इमारत क्र. १३५८, गद्रे चेंबर्स, सदाशिव पेठ पुणे- ३०४५ fA ५ वा माळा, इमारत क्र. १३५८, गद्रे चेंबर्स, सदाशिव पेठ पुणे- ३०
१०. श्री सुनिल पोटे, युवा मित्र, अशासकीय संघटना, सिन्नर, जि. नाशिक.
११. श्री.किरण पटवर्धन, व्यावसायिक सल्लागार, प्रसाद अपार्टमेंट लेन क्र. ९, प्रभात रोड, डेक्कन जिमखाना, पुणे-०४ प्रसाद अपार्टमेंट लेन क्र. ९, प्रभात रोड, डेक्कन जिमखाना, पुणे-०४
१२. श्री. माणिकराव दांगडे पाटील,बारामती, जि. पुणे
१३. ॲड श्री. अनिरुध्द येचाळे, लातूर
१४. श्री. राजाभाऊ फड, परळी, जि. बीड
१५. श्री. भास्कर राजाराम अंबेकर, सिंगल जीन, गांधी चमन, जुना जालना.
१६. निवडनस्ती पदुम-४.